**अर्थसंकल्पिय अनुदान सन २०१७-२०१८**
**“२२१५ पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१) (०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (२२१५ १८४३)” मागणी क्रमांक वाय -२**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४१७/प्र.क्र.१२७/पापु-२३**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
**तारीख : १७ एप्रिल, २०१७**

**वाचा :-**

**शासन निर्णय,वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०१७/प्र.क्र.६८/अर्थसंकल्प-३,दि.१ एप्रिल, २०१७**

**प्रस्तावना :-**

सन २०१७-२०१८ चा अर्थसंकल्प दिनांक १८ मार्च, २०१७ रोजी विधानमंडळास सादर करण्यात आला. सदर अर्थसंकल्पावर मागणीनिहाय चर्चा होऊन संपूर्ण अर्थसंकल्पास मंजूरी मिळेपर्यन्त काही भागासाठीचा खर्च भागविण्यासाठी विधानमंडळाने महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) विधेयक, २०१७ मंजूर केले आहे. सदर विधेयकाचे अधिनियमात रुपांतर झाले असून ते महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-२४ म्हणून महाराष्ट्र शासन, राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक २९ मार्च, २०१७ मध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे. तसेच सन २०१७-१८ या वर्षाकरिता अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध असलेले लेखा अनुदान वितरीत करण्यास उपरोक्त परिपत्रकान्वये वित्त विभागाने परवानगी दिली आहे.

२. जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील वर्ग १ व वर्ग २ च्या अधिका-यांचे वेतन व वेतनेतर खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-२ “२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१)(०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (२२१५ १८४३)” या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष सन २०१७-२०१८ करिता ०१, वेतन यासाठी रुपये ३०,१५,१०,०००/- (अक्षरी रुपये तीस कोटी पंधरा लाख दहा हजार फक्त) व ११, देशांतर्गत प्रवास खर्चासाठी रुपये १,०१,९८,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी एक लाख अठ्ठयाण्णव हजार फक्त ) असे एकूण रुपये ३१,१७,०८,०००/- (अक्षरी रुपये एकतीस कोटी सतरा लाख आठ हजार फक्त) इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे.

३. आता वित्त विभागाने सन २०१७-२०१८ करीता उपरोक्त अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी अंदाजे २५% निधी वेतन व वेतनेतरसाठी अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला आहे. परंतु सर्व ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांचेकडून अनुदान मागण्या प्राप्त झालेल्या नाहीत, त्यामुळे जिल्हा परिषदांकडून सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षात खर्च झालेले एकूण अंतिम अनुदान विचारात घेऊन त्यानुसार तीन महिन्यासाठीचा अंदाजीत निधी वितरित करण्याचे प्रस्तावित आहे. त्यास अनुसरुन जिल्हा परिषद ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील वर्ग १ व वर्ग २ च्या अधिका-यांचे ०१, वेतन व ११, देशांतर्गत प्रवास खर्च भागविण्यासाठी लेखाशिर्ष २२१५ १८४३ अंतर्गत एकूण रुपये ७,२१,९५,०००/- (अक्षरी रुपये सात कोटी एकवीस लाख पंच्याण्णव हजार फक्त) इतक्या निधीचे वाटप जिल्हा परिषदांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय:-

सन २०१७-२०१८ या वित्तीय वर्षासाठी “२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१)(०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (२२१५ १८४३)” या लेखाशिर्षाखाली जिल्हा परिषद ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील वर्ग १ व वर्ग २ च्या अधिका-यांचे ०१, वेतन व ११, देशांतर्गत प्रवास खर्च भागविण्यासाठी या शासन निर्णयासोबतच्या “विवरणपत्र अ” मधील स्तंभ ५ मध्ये दर्शविल्यानुसार आता एकूण अनुदान रुपये ७,२१,९५,०००/- (अक्षरी रुपये सात कोटी एकवीस लाख पंच्याण्णव हजार फक्त) संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद व कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांना मंजूर करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहील. या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र अ मधील स्तंभ क्रमांक ५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या रकमांपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता सर्व संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याचीही दक्षता घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णयान्वये तसेच यापूर्वी वितरीत केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर केल्याची खात्री करुनच पुढील आर्थिक वर्षासाठी आवश्यक निधीची मागणी करण्याची दक्षता घेण्यात यावी. पुढील निधीचे मागणीपत्र प्राप्त झाल्याशिवाय निधी वितरीत केला जाणार नाही याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या लेखानुदानातून होणारा खर्च मागणी क्रमांक वाय-२ “२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१)(०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (२२१५ १८४३)” ०१, वेतन व ११, देशांतर्गत प्रवास खर्च या लेखाशिर्षामधून आर्थिक वर्ष सन २०१७-२०१८ साठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.६८/अर्थसंकल्प-३, दिनांक १ एप्रिल,२०१७ अन्वये विभागांना दिलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११९०४०२४४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish V Kove

Digitally signed by Satish V Kove
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=W.S.S.D., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e13b027a7b550970150cf7dc69d276db3b1a6ebe3f71610fb5e8ff55b1676c8a, cn=Satish V Kove
Date: 2017.04.18 11:13:36 +05'30'

**(सतीश वि. कोवे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विधानसभा / विधान परिषद, सर्व
२. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. विभागीय आयुक्त,
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
६. संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पुणे
७. सर्व जिल्हा परिषदेचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
८. प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
९. जिल्हा पाणी पुरवठा अधिकारी तथा अधिक्षक अभियंता महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
१०. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सर्व
११. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
१२. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४. उप अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा उप विभाग, जिल्हा परिषद, सर्व
१५. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
१६. वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१९)
१७. कार्यासन क्रमांक पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१८. ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१९. निवड नस्ती कार्यासन पापु-२३

विवरणपत्र-अ

शासन निर्णय क्रमांक बजेट-२०१६/प्र.क्र.१४०/पापु-२३, दिनांक १७ एप्रिल, २०१७ सोबतचे सहपत्र

मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१)(०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (२२१५ १८४३)"

| अ. क्र. | जिल्ह्याचे नांव | सन २०१७-२०१८ करीता या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेले अनुदान | | | या शासन निर्णयान्वये लेखाशीर्ष २२१५ १८४३ खाली वितरीत करण्यात येत असलेली एकूण रक्कम (अक्षरी रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| | | वेतन | देशांतर्गत प्रवास खर्च | वितरीत करण्यात येत असलेली एकूण रक्कम (३+४) | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | ठाणे | १८००००० | ५०००० | १८५०००० | रूपये अठरा लाख पन्नास हजार फक्त |
| २ | पालघर | १३५०००० | ० | १३५०००० | रूपये तेरा लाख पन्नास हजार फक्त |
| ३ | रायगड | १८००००० | ० | १८००००० | रूपये अठरा लाख फक्त |
| ४ | रत्नागिरी | २२५०००० | ८०००० | २३३०००० | रूपये तेवीस लाख तीस हजार फक्त |
| ५ | सिंधुदुर्ग | १२००००० | ८०००० | १२८०००० | रूपये बारा लाख ऐंशी हजार फक्त |
| ६ | नाशिक | १८००००० | ८०००० | १८८०००० | रूपये अठरा लाख ऐंशी हजार फक्त |
| ७ | धुळे | १९५०००० | ५०००० | २०००००० | रूपये वीस लाख फक्त |
| ८ | नंदुरबार | १५००००० | १२५००० | १६२५००० | रूपये सोळा लाख पंचवीस हजार फक्त |
| ९ | जळगांव | १९५०००० | ८०००० | २०३०००० | रूपये वीस लाख तीस हजार फक्त |
| १० | अहमदनगर | २८५०००० | ० | २८५०००० | रूपये अठ्ठावीस लाख पन्नास हजार फक्त |
| ११ | पुणे | ३४५०००० | ८०००० | ३५३०००० | रूपये पस्तीस लाख तीस हजार फक्त |
| १२ | सातारा | ३३००००० | १२५००० | ३४२५००० | रूपये चौतीस लाख पंचवीस हजार फक्त |
| १३ | सांगली | १०५०००० | २५००० | १०७५००० | रूपये दहा लाख पंच्याहत्तर हजार फक्त |
| १४ | सोलापूर | २४००००० | ५०००० | २४५०००० | रूपये चोवीस लाख पन्नास हजार फक्त |
| १५ | कोल्हापूर | ३०००००० | ० | ३०००००० | रूपये तीस लाख फक्त |
| १६ | औरंगाबाद | २७००००० | ५०००० | २७५०००० | रूपये सत्तावीस लाख पन्नास हजार फक्त |
| १७ | जालना | ३०००००० | ५०००० | ३०५०००० | रूपये तीस लाख पन्नास हजार फक्त |
| १८ | परभणी | १८००००० | ५०००० | १८५०००० | रूपये अठरा लाख पन्नास हजार फक्त |
| १९ | हिंगोली | ७५०००० | २५००० | ७७५००० | रूपये सात लाख पंच्याहत्तर हजार फक्त |
| २० | बीड | १२००००० | २५००० | १२२५००० | रूपये बारा लाख पंचवीस हजार फक्त |
| २१ | नांदेड | २५५०००० | ८०००० | २६३०००० | रूपये सव्वीस लाख तीस हजार फक्त |
| २२ | उस्मानाबाद | १९५०००० | ८०००० | २०३०००० | रूपये वीस लाख तीस हजार फक्त |
| २३ | लातूर | २५५०००० | १२५००० | २६७५००० | रूपये सव्वीस लाख पंच्याहत्तर हजार फक्त |
| २४ | बुलढाणा | १९५०००० | ० | १९५०००० | रूपये एकोणीस लाख पन्नास हजार फक्त |
| २५ | अकोला | १५००००० | ० | १५००००० | रूपये पंधरा लाख फक्त |
| २६ | वाशिम | १०५०००० | ५०००० | ११००००० | रूपये अकरा लाख फक्त |
| २७ | अमरावती | २७००००० | ८०००० | २७८०००० | रूपये सत्तावीस लाख ऐंशी हजार फक्त |
| २८ | यवतमाळ | २७००००० | ८०००० | २७८०००० | रूपये सत्तावीस लाख ऐंशी हजार फक्त |
| २९ | वर्धा | १९५०००० | २५००० | १९७५००० | रूपये एकोणीस लाख पंच्याहत्तर हजार फक्त |
| ३० | नागपूर | २५५०००० | १२५००० | २६७५००० | रूपये सव्वीस लाख पंच्याहत्तर हजार फक्त |
| ३१ | भंडारा | २२५०००० | ७०००० | २३२०००० | रूपये तेवीस लाख वीस हजार फक्त |
| ३२ | गोंदिया | १८००००० | १२५००० | १९२५००० | रूपये एकोणीस लाख पंचवीस हजार फक्त |
| ३३ | चंद्रपूर | १८००००० | ८०००० | १८८०००० | रूपये अठरा लाख ऐंशी हजार फक्त |
| ३४ | गडचिरोली | १८००००० | ५०००० | १८५०००० | रूपये अठरा लाख पन्नास हजार फक्त |
| | एकूण | ७०२००००० | १९९५००० | ७२१९५००० | रूपये सात कोटी एकवीस लाख पंच्याण्णव हजार फक्त |

Satish V Kove

Digitally signed by Satish V Kove
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=W.S.S.D., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e13b027a7b550970150cf7dc69d276db3b1a6ebe3f71610fb5e8ff55b1676c8a, cn=Satish V Kove
Date: 2017.04.18 11:14:05 +05'30'

(सतीश वि. कोवे)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन